जालना-जळगाव या नवीन रेल्वे मार्ग प्रकल्पाकरीता राज्य शासनाचा आर्थिक सहभाग देण्यास मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: आरएलवाय-०५२२/प्र.क्र.१३५/परि-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ११ जुलै, २०२३.

**वाचा** : १) भारत सरकार, रेल्वे मंत्रालय (रेल्वे बोर्ड) यांचे अर्धशासकीय पत्र क्र. D.O.No.२०२२/W-I/CR/NL/J-JL, दि. २७.०४.२०२३.
२) मुख्य प्रशासकीय अधिकारी, मध्य रेल्वे यांचे पत्र क्र.EW/६८९/S/३५१-/FLS-DPR, दि.३१.०५.२०२३.

**प्रस्तावना :-**

राज्याच्या ग्रामीण विशेषत: अविकसीत भागातील रेल्वे प्रकल्पांना गती मिळावी व हे प्रकल्प जलद गतीने पुर्ण व्हावेत याकरीता अशा निवडक प्रकल्पांमध्ये ४०% ते ५०% आर्थिक सहभाग देण्याचे धोरण राज्य शासनाने स्वीकारले आहे.

केंद्र शासनाने सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पामध्ये नवीन जालना ते जळगाव १७४ किमी लांबीचा रेल्वेमार्ग बांधण्याचा समावेश केला आहे. सदर रेल्वे मार्ग हा मराठवाड्यातील जागतिक दर्जाचे पर्यटन केंद्र असलेल्या अजिंठा लेणी तसेच पवित्र तिर्थक्षेत्र असलेले राजूर गणपती यांना जोडणारा आहे. सदरील रेल्वे मार्ग झाल्यास, तो शाश्वत विकासापासून वंचित असलेल्या मराठवाड्यातील जनतेच्या विकासात भर टाकणारा प्रकल्प होईल, असे नमूद करून सदर प्रकल्पामध्ये राज्याने आर्थिक सहभागास मंजूरी देण्याबाबत केंद्रीय रेल्वे मंत्रालयाने त्यांच्या संदर्भाधीन क्र.१ वरील दिनांक २७.०४.२०२३ रोजीच्या पत्रान्वये विनंती केलेली आहे.

तसेच जालना-जळगाव या नवीन ब्रॉडगेज रेल्वे प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार केला असून त्यानुसार या प्रकल्पाची अंदाजित किंमत/ खर्च (जमीन अधिग्रहणासह) रू.७१०५.४३ कोटी इतका असल्याचे मध्य रेल्वेने त्यांच्या संदर्भाधिन क्र.२ वरील दिनांक ३१.०५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये राज्य शासनास कळविले आहे.

केंद्रीय रेल्वे मंत्रालयाने केलेल्या विनंतीनुसार तसेच मध्य रेल्वेने तयार केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालास अनुसरून जालना-जळगाव या नवीन ब्रॉडगेज रेल्वे मार्ग (१७४ कि.मी.) प्रकल्पात केंद्र सरकार (रेल्वे मंत्रालय) : राज्य शासन यांचा ५०:५० टक्के आर्थिक सहभाग असल्याने यानुषंगाने एकूण प्रकल्प किंमतीच्या ५०% म्हणजेच रू.३५५२.७१५ कोटी एवढ्या खर्चासाठी राज्य शासनाच्या आर्थिक सहभागास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार राज्य मंत्रिमंडळ बैठकीमध्ये पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

१) जालना-जळगाव या नवीन ब्रॉडगेज रेल्वे मार्ग (१७४ किमी) प्रकल्पाकरीता महाराष्ट्र शासनाने एकूण प्रकल्प किंमतीच्या ५०% पर्यंत म्हणजेच रू. ७१०५.४३ कोटींपैकी रु. ३५५२.७१५ कोटीपर्यंतच्या आर्थिक सहभागास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२) राज्य शासनाच्या हिश्श्यामध्ये जमिनीची किंमत (शासकीय जमीन अथवा इतर जमीन) अंतर्भुत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३) सदर रक्कम निधीच्या उपलब्धतेनुसार टप्प्या-टप्प्याने उपलब्ध करून देण्यासही शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४) सदर बाबी वरील येणारा खर्च मागणी क्र.बी-७, ३००१ - भारतीय रेल्वे-धोरण निश्चिती, संचालन, संशोधन व इतर संकीर्ण संघटना, ००, ८०० - इतर खर्च, (००), (००) (०२) - रेल्वे प्रकल्पामध्ये राज्य शासनाचा सहभाग (कार्यक्रम) (३००१-००५४), ३२- अंशदाने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५) सदरचा शासन निर्णय राज्य मंत्रिमंडळाने दिनांक २८.०६.२०२३ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१११४४९२२३७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SIDDHARTH RAMBHAU KHARAT

Digitally signed by SIDDHARTH RAMBHAU KHARAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=22C1B7C1413E77554A8E64CBC60B74FB6471605C32ACF8B9B51B2B018FEFDC0B, cn=SIDDHARTH RAMBHAU KHARAT
Date: 2023.07.11 14:51:34 +05'30'

**( सिध्दार्थ खरात )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उप मुख्यमंत्री, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
५) मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६) सर्व मा.मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
८) मा.उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
९) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
१०) मा.विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
११) मा.संसद सदस्य (महाराष्ट्र राज्य)
१२) मा.विधानसभा सदस्य (सर्व)
१३) मा.विधानपरिषद सदस्य (सर्व)
१४) सचिव, केंद्रीय रेल्वे बोर्ड, रेल्वे मंत्रालय, रेल भवन, नवी दिल्ली.
१५) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
१६) महालेखापाल, १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१९) अर्थसंकल्प-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) वित्त विभाग (व्यय-८/अर्थ-११), मंत्रालय, मुंबई.
२१) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई.
२२) निवड नस्ती, परिवहन-५.